**गोबरधन कार्यक्रमांतर्गत राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीची स्थापना करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि २०१८/प्र.क्र.३६७/पापु-१६
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २८ ऑगस्ट , २०१८

**वाचा :-**

**केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या मार्गदर्शक सूचना एप्रिल, २०१८**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाने गोबरधन कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सर्वसाधारण सूचना निर्गमित केल्या आहेत. गोबरधन कार्यक्रमाची यशस्वीरित्या प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती (State Technical Advisory Committee-STAC) गठीत करण्यासंदर्भात सदर सर्वसाधारणामधील Role of State अन्वये निर्देशित केले आहे. त्यास अनुसरून महाराष्ट्र राज्यामध्ये गोबरधन कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी, ग्रामपंचायतीने राबवावयाच्या प्रस्तावांना सहाय्य करण्यासाठी तांत्रिक यंत्रणेची (Technical Agency) निवड करणे, तांत्रिक यंत्रणेने (Technical Agency) तयार केलेल्या व सादर केलेल्या प्रस्तावांना मान्यता देणे या व इतर बाबींकरिता राज्य स्तरीय तांत्रिक सल्लागार समिती (State Technical Advisory Committee-STAC) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासन पेयजल व स्वच्छता मंत्रालयाने दिलेले निर्देशानुसार महाराष्ट्र राज्यामध्ये गोबरधन कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती (State Technical Advisory Committee-STAC) गठीत करण्यात येत आहे:-

| क्र. | अधिकारी पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | उप सचिव तथा प्रकल्प संचालक,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग. | अध्यक्ष |
| २ | कृषी,पशुसंवर्धन,दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग, यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ३ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ४ | संचालक, मित्रा, नाशिक. | सदस्य |
| ५ | भाभा ॲटोमीक रिसर्च सेंटर, मुंबई यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ६ | गोपुरी आश्रम,मु.पो.वागदे,गोपूरी,ता.कणकवली,जि.सिंधुदुर्ग यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ७ | संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापूर. | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१)गोबरधन कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी माहिती शिक्षण व संवाद धोरण (IEC Strategy) ठरविणे.

२) ग्रामपंचायतीना सहाय्यकृत (Technical Agency ) तांत्रिक यंत्रणेची निवड करणे

३ )तांत्रिक यंत्रणेने (Technical Agency) सादर केलेल्या प्रस्तावांची छाननी करणे.

४) सदर प्रस्तावांची सक्षमता तपासून मान्यता प्रदान करणे.

५) प्रत्येक महिन्याचा अहवाल शासनास सादर करणे.

**समितीची मुदत :-**

उपरोक्त समिती दोन वर्षाकरीता कार्यरत राहील. समितीच्या अशासकीय सदस्यांना दैनिक / प्रवासभत्ता वित्त विभागाच्या प्रचलित आदेशानुसार अनुज्ञेय राहतील. सदर खर्च स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) या योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाची भूमिका:-**

गोबरधन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाने (DWSC) संबंधित जिल्ह्यांच्या प्रस्तावांना मान्यता देणे व संनियंत्रण करणे यासाठी समन्वय समितीने (Nodal Agency) म्हणून काम करावयाचे आहे. तसेच, राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने ठरविलेल्या माहिती शिक्षण व संवाद धोरणानुसार जिल्हयातील जास्तीत गावांचा या कार्यक्रमात सहभाग करुन घेण्यासाठी कार्यवाही करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१६३९३२००२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2018.08.29 16:03:41 +05'30'

**(स्मि.स.राणे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, पशुसंवर्धन व दुग्ध विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई.
५. उप सचिव तथा प्रकल्प अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
७. संचालक, मित्रा, नाशिक.
८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर नवी मुंबई.
९. संचालक, भाभा ऑटोमीक रिसर्च सेंटर, मुंबई.
१०. गोपुरी आश्रम,मु.पो.वागदे,गोपूरी,ता.कणकवली,जिल्हा सिंधुदुर्ग.
११. अवर सचिव पापु-२५, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर नवी मुंबई.
१२. संग्रहार्थ.